गृह विभागाच्या अधिपत्याखालील कारागृह विभागातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिका-यांच्या पदस्थापना/ बदली याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांकः जेएलई-०३१४/४३१/प्र.क्र.९०/१४/तुरुंग-१
जागतिक व्यापार केंद्र, सेंटर नं.१, ३० वा मजला
कफ परेड, मुंबई-४०० ००५
दिनांक: ०६ जून, २०१५.

वाचा :-

१) मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दि.३१.१०.२०१३ रोजी दिलेला निर्णय.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दिनांक ३१.०१.२०१४

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दिनांक २०.०५.२०१४

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दिनांक १९.०१.२०१५

प्रस्तावना :-

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दिनांक ३१.१०.२०१३ रोजी दिलेल्या निदेशास अनुसरुन, शासनाने गट अ, गट-ब व गट क मधील अधिकारी/कर्मचा-यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबतचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णयान्वये घेतला आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार गृह विभागाच्या अधिपत्याखालील कारागृह विभागातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) अधिकारी यांच्या पदस्थापना /बदली याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

### शासन निर्णय:-

गृह विभागाच्या अधिपत्याखालील कारागृह विभागातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) अधिका-यांच्या पदस्थापना/बदलीबाबत महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन

अधिनियमातील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) ची स्थापना करण्यात येत आहे:-

नागरी सेवा मंडळ (१)

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव (अपिल व सुरक्षा) | अध्यक्ष |
| २ | अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य |
| ३ | सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य |

नागरी सेवा मंडळ (१) सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून अस्तित्वात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०६१०५९०६८४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jaysing L Pawara

Digitally signed by Jaysing L Pawara
DN: CN = Jaysing L Pawara, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.06 12:26:25 +05'30'

**( ज.ल.पावरा )**
उप सचिव,गृह विभाग,महाराष्ट शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव
२) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे
३) सह सचिव/उप सचिव , आदिवासी विकास विभाग
४) विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह) दक्षिण विभाग,मुंबई
५) कारागृह उपमहानिरीक्षक,पश्चिम विभाग,पुणे, मध्य विभाग,औरंगाबाद,पूर्व विभाग,नागपूर
६) मा.राज्यमंत्री (गृह,शहरे) यांचे खाजगी सचिव
७) मा.राज्यमंत्री (गृह,ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
८) सामान्य प्रशासन विभाग (का.क्र.१२),मंत्रालय,मुंबई
९) अवर सचिव/कक्ष अधिकारी कार्यासन तुरुंग-२/३
१०) निवड नस्ती कार्यासन तुरुंग-१